धनुष्कोटि दाबून सर्व देवांना विरोध केला! मग देवांनीं बोलण्यास आरंभ केला, त्यासरशीं शंकराच्या धनुष्याची दोरी तुटली व तें धनुष्य दोरीवांचूनच स्फुरण पावूं लागलें!

अशा रीतीनें धनुष्य विफल होतांच यज्ञपुरुषासह सर्व देव शंकराला शरण गेले आणि शंकरानेंहि त्यांवर कृपा केली. प्रभु शंकर प्रसन्न झाला आणि त्यानें आपला क्रोध जलाशयांत टाकिला. तो शंकराचा क्रोध अग्निरूपानें समुद्राचें पाणी सदोदित शोषित असतो. नंतर त्या प्रसन्न शंकरानें भगाला डोळे, सवित्याला हात आणि पूषाला दांत दिले आणि पूर्वीप्रमाणें यज्ञ चालू करण्यास अनुज्ञा दिली. पुनः सर्वत्र शांतता झाली आणि देवांनींहि शंकराच्या हविर्भागाची योजना केली. हे भारता, तो शंकर क्रुद्ध होतांच सर्व विश्व अस्वस्थ झालें आणि तो प्रसन्न होतांच सर्वत्र शांतता नांदूं लागली.

युधिष्ठिरा, त्या शंकराच्या कृपेनें तुझे सर्व महारथ पुत्र आणि पांचाल धृष्टद्युम्नाचे असंख्य शूर अनुचर यांस अश्वत्थाम्यानें रणांत मारलें! हा पराक्रम अश्वत्थाम्याचा नाहीं, तें तूं मनांतहि आणूं नकोस! तो केवळ महादेवाचाच प्रसाद होय, त्यामुळें तें सर्व घडून आलें. ही गोष्ट लक्षांत ठेवून तूं आतां पुढील कार्यास लाग! १०. २. १८.

[ येथें दहावें सौप्तिक पर्व संपलें. ]

( येथें दुसरें ऐषीक उपपर्व संपलें. )

---

यापुढें अकरावें स्त्रीपर्व लागेल, त्याचा हा आद्य श्लोक आहे—

जनमेजय—**हते दुर्योधने चैव हते सैन्ये च सर्वशः।**
**धृतराष्ट्रो महाराज श्रुत्वा किमकरोन्मुने॥**